**महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक (मेरी) अंतर्गतच्या संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक या कार्यालयातील विभागीय लेखापाल हे पद महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक (मेटा) या कार्यालयास उपलब्ध करुन देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- आढावा-२०२१/प्र.क्र. ६१/आ.(पुनर्रचना),**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ नोव्हेंबर, २०२१.

<u>वाचा:-</u>
१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. आढावा १००२/(३३५/२००२)/आ.(प्रशि), दि.०६/०२/२००३.
३) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.मेरीना २०१६/(प्र.क्र.१७८/१६)/ लाक्षेवि (आस्था), दि.०६/०१/२०१७
४) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-२०१७/प्र.क्र.१८५/२०१७/आ.(प्रशि), दि.०४/०८/२०१७.
५) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा २०१८/प्र.क्र१४२/२०१८/आ.(प्रशि), दि.२०/०८/२०१८.
६) मसं/संप्रजसंसु/मअप्रप्रना/प्रलि/११६५/२०२१, महासंचालक(सं,प्र,ज,सं,व सु), दि.०१/१०/२०२१.

**<u>प्रस्तावना:-</u>**

जलसंपदा विभागांतर्गत सर्व ई-प्रशासन प्रकल्पांची माहिती, त्याचे पृथ:करण व सादरीकरणामध्ये संपदा अभियांत्रिकी केंद्र यांचे नियंत्रण विचारात घेता संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक या कार्यालयाचे प्रशासकीय व तांत्रिक संनियंत्रण अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, मुंबई या कार्यालयांतर्गत वर्ग करण्यात आले आहे. महासंचालक, मेरी यांनी पत्र दि.०३/०६/२०१७ अन्वये त्यांच्या कार्यालयांतर्गतची एकूण ५० मंजूर पदे संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक यांच्याकडे वर्ग केली आहेत. तथापि, सदर पदांमध्ये विभागीय लेखापाल हे पद मंजूर नाही. परिणामी विभागासाठी आवश्यक असणारी हत्यारे व संयंत्रे, शास्त्रीय व गणिती उपकरणे यांची खरेदी व देखभाल-दुरुस्ती तसेच लेखा शाखेतंर्गत दैनंदिन कामकाजात अडचण निर्माण होत असल्यामुळे संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक या कार्यालयास विभागीय लेखापाल हे उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक अंतर्गत कार्यरत तांत्रिक आस्थापना ही मेरी, नाशिक मधील वैज्ञानिक संवर्गाची असून या विभागीय कार्यालयातंर्गतच्या विविध प्रशासकीय बाबी हाताळण्यास अडचणी निर्माण होत असल्यामुळे संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई या मंडळातंर्गतचे संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक या कार्यालयाचे नियंत्रण महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (DTHRS) (मेरी), नाशिक यांच्याकडे वर्ग करण्यात आलेले आहे.

३. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक यांनी महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या कार्यालयातील पायाभूत सुविधाची विकास कामे, देखभाल व दुरुस्तीच्या कामासह निविदा प्रक्रियाची कामे योग्य पध्दतीने पूर्ण करण्याच्या अनुषंगाने संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक कार्यालयातील विभागीय लेखापाल हे पद वर्ग करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक या कार्यालयातील विभागीय लेखापाल हे पद अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या कार्यालयास फिरवाफिरवीने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक अंतर्गतच्या अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक अंतर्गतच्या संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक या कार्यालयाच्या आस्थापनेवर मंजूर असलेले विभागीय लेखापाल हे पद अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या कार्यालयास फिरवाफिरवीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/१९९२ अन्वये आस्थापना फिरवाफिरवीने वर्ग करण्यास जलसंपदा विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या कार्यालयांसाठी पद वर्ग करुन देण्यात येत असून त्यामुळे शासनावर कोणताही अधिक आर्थिक भार पडणार नाही.

३. उपरोक्त कार्यालयांतर्गतच्या पदांची फिरवाफिरव ही दि.०१/१२/२०२१ पासून अंमलात येईल याद्दष्टीने महासंचालक, मेरी, नाशिक यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल शासनास त्वरीत सादर करावा. तसेच, मुदतवाढीचे प्रस्ताव सादर करताना आवश्यकते बदल करुन मुदतवाढीचे प्रस्ताव शासनास सादर करावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२१११२३१७४५३१५७२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Rakhi Sachin Chavan
Date: 2021.11.23 17:48:03 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, जलसंपदा विभाग**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (ज.सं.प्र. व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (मेरी), नाशिक.
९. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१०. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सह सचिव (सेवा)/उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
१३. अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
१४. कार्यकारी अभियंता, संपदा अभियांत्रिकी केंद्र, नाशिक.
१५. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयात झालेल्या बदलाची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
१६. कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.